भारताचे नियंत्रक व महालेखा परीक्षक
यांच्या अहवालातील प्रलंबित निरीक्षण
अहवाल/आक्षेप, प्रारुप परिच्छेद, तसेच
परिच्छेदांचा अहवालनिहाय तपशील

पाठविणेबाबत

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन परिपत्रक, क्र.भानिम-२०११/प्र.क्र.७८५/प्रशासन-५
दिनांक :- ३० जुलै, २०११.

**वाचा:-** (१). वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. भानिम-१०२००/प्र.क्र.२०५/लोलेस,
दिनांक, १८ जानेवारी, २००१.
(२). वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. - लोलेस-१०.७/प्र.क्र.७९ (ब) /लोलेस
दिनांक, ११ जुलै, २००७.

## शासन परिपत्रक

**प्रस्तावना-** भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे अहवाल विधान मंडळास सादर झाल्यानंतर अहवालातील विभागाशी संबंधित परिच्छेद/अनियमितता या बाबीवरील स्पष्टीकरणात्मक ज्ञापनेस महालेखापाल कार्यालयाची संमती/अधिसंमती (vetting) घेऊन तीन महिन्याचे आत लोकलेखा समिती व इतर वैधानिक समित्यांकडे पाठविण्याबाबत संदर्भाधिन परिपत्रकान्वये सुचना देण्यात आलेल्या आहेत. तथापि, उद्योग, ऊर्जा व कामगार प्रभागाकडून विहित मुदतीत स्पष्टीकरणात्मक ज्ञापने लोकलेखा समितीकडे पाठविली जात नाहीत, ही गंभीर बाब आहे. तसेच विभागही स्पष्टीकरणात्मक ज्ञापने अत्यंत विलंबाने लोकलेखा समितीकडे पाठवित असून लोकलेखा समितीच्या कामकाजाकडे विभाग गांर्भ र्याने बघत नसल्याबद्दल सन २००७-२००८ च्या सहाव्या अहवालातील परिच्छेद क्रमांक १.६८ मध्ये समितीने याबाबत तीव्र नाराजी व्यक्त केली आहे.

**शासन परिपत्रक -**

सामान्य प्रशासन विभागातील रचना व कार्यपध्दती विभागाकडून सर्व मंत्रालयीन विभागाशी संबंधित प्रलंबित प्रकरणांचा आढावा ज्या प्रकारे घेण्यात येतो त्याच प्रकारे लोकलेखा समिती तसेच इतर वैधानिक समित्या व लेखापरीक्षा परिच्छेदांशी संबधित प्रलंबित प्रकरणांचासुध्दा आढावा एकत्रितरित्या वित्त विभागाकडून घेण्यात येणार आहे. उद्योग, ऊर्जा व कामगार प्रभागाने लेखापरिच्छेदाशी संबंधित त्या - त्या प्रभागाची प्रत्येक महिन्याची एकत्रित माहिती त्यापुढील प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत वित्त विभागाच्या लोलेस कार्यासनाकडे पाठवावयाची आहे.

यास्तव विहित प्रपत्रात माहिती भरुन प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत प्रशासन -५ (समन्वय) या कार्यासनाकडे पाठविण्याची दक्षता घेण्यात यावी.

cr-785-2011

उद्योग, ऊर्जा व कामगार प्रभागाशी प्रलंबित असलेल्या परिच्छेदांवरील स्पष्टीकरणात्मक ज्ञापने महालेखापाल कार्यालयाच्या मान्यतेनंतर तातडीने लोकलेखा समितीकडे पाठविण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०७३०१८२०५०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(रा.का.जांबु-पटेल)
कार्यासन अधिकारी

प्रति,

१) सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख/सार्वजनिक उपक्रम/महामंडळ/मंडळ
२) सर्व उप सचिव /विशेष कार्य अधिकारी/अवर सचिव/कक्ष अधिकारी, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई.
३) संचालक, (लेखा व कोषागारे),लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई.
४) सह संचालक (लेखा व कोषागरे),लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई.

प्रत,

१) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१ ,महाराष्ट्र मुंबई.
२ ) महालेखापाल (लेखापरीक्षा) १ , महाराष्ट्र मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१ , महाराष्ट्र मुंबई.
४) महालेखापाल (वाणिज्यिक लेखापरीक्षा)-१ महाराष्ट्र मुंबई.
५) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र नागपूर
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र नागपूर
७) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
८) उपसचिव तथा नियंत्रक/सदस्य सचिव,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय
९) कार्यासन अधिकारी (कार्यासन-लोलेस/कोषागार-५/विनियम) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) निवड नस्ती, प्रशासन -५ , उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई..

प्रत-माहितीसाठी सादर,

प्रधान सचिव ( कामगार व प्रशासन)
प्रधान सचिव ( ऊर्जा)
प्रधान सचिव ( उद्योग)
सचिव (मध्यम व लघु उद्योग) तथा पदसिद्ध विकास आयुक्त (उद्योग)

cr-785-2011